**१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेंतर्गत मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील दादर - भोईवाडा येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती/ नुतनीकरणास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण १११६/८८८/प्र.क्र.१५७/कार्या.११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ जून, २०१८.

<u>वाचा</u> : १.प्रबंधक (निरिक्षणे -२) , उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.B(W)६०४९/२०१०/२४२८, दि.१/९/२०१६ व क्र. B(W)६०४९/२०१०/२७८०, दि.१४/१०/२०१६

२. मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांचे पत्र क्र. ४२३३/१६, दि.१९/८/२०१६ व क्र.४७६३/१६, दि.२६/९/२०१६

३. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०७/कार्या.९, दि.१०/११/२०१६.

४. शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/नऊ,दि.१२/६/२०१७

**<u>प्रस्तावना</u> :**

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या “न्याय व्यवस्थेचे सक्षमीकरण” (Strengthening the Justice) या प्रयोजनासाठी सन २०१५-२०१६ ते २०१९-२०२० या ५ वर्षाच्या कालावधीकरीता महाराष्ट्र राज्यासाठी रुपये १०१४ कोटी इतक्या निधीची शिफारस केली आहे. १४ व्या वित्त आयोगांतर्गत कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण या घटकासाठी ५ वर्षाच्या कालावधीकरीता रु.२२८ कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. १४ व्या वित्त आयोगाने केलेल्या शिफारशींची कार्यक्षम अंमलबजावणी करण्यासाठी दि.९/३/२०१६ रोजी उच्चस्तरीय संनियंत्रण समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समितीच्या बैठकीमध्ये मा.उच्च न्यायालयाकडून प्राप्त झालेल्या कृती आराखड्यास तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. तसेच वित्त विभागाच्या मान्यतेने संदर्भाधीन दि.१२/६/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये १४ व्या वित्त आयोगांतर्गत न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्तीच्या कामांना रुपये ५० लक्ष मर्यादेपर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

मा.उच्च न्यायालयाच्या दि.१/९/२०१६ व दि.१४/१०/२०१६ रोजीच्या संदर्भीय अनुक्रमांक १ येथील पत्रान्वये मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई त्यांच्या अधिपत्याखालील दादर - भोईवाडा येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती / नविनीकरणाचे प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. ते सन २०१५-१६ व २०१६-२०१७ च्या दरसूचीनुसार आहेत. या प्रस्तावातील अंदाजपत्रके संबंधित शाखा अभियंता, दादर विद्युत विभाग, उप विभागीय अभियंता, उत्तर (सा.बां.) उप विभाग, दादर यांनी तयार केली असून संबंधित उप अभियंता व कार्यकारी अभियंता तसेच मुख्य महादंडाधिकारी, मुंबई यांनी साक्षांकित केली आहेत. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर अंदाजपत्रक तपासून प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविली आहे. त्यानुसार मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील दादर - भोईवाडा येथील कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेअंतर्गत मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील दादर - भोईवाडा येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती /नुतनिकरणासाठी येणाऱ्या रु.२२,५८,९०४/- (अक्षरी  रुपये बाव्वीस लाख अठ्ठावन्न हजार नऊशे चार फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपखालील दादर - भोईवाडा येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती/ नुतनीकरणाच्या  कामाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | मा.उच्च न्यायालयाच्या पत्राचा दिनांक | न्यायालयीन इमारत | कामाचे स्वरुप | अंदाजपत्रकीय किंमत | सा.बां.विभागाने परिगणित केलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | १/९/२०१६ | दादर | Fixing tiles in toilets, repairing work in toilet replacing drainage pipelines, fixing aluminium partition and sintex tank and other related works | २०,३७,०९४ | २१,५४,६१९ |
| २ | १४/१०/२०१६ | दादर भोईवाडा | Replacement of ceiling fans, fitting and plug points for computer in Court nos 5,13 and 62 | १,०४,२८५ | १,०४,२८५ |
| **एकूण** | | | | **२१,४१,३७९** | **२२,५८,९०४** |

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील दादर - भोईवाडा येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती/ नविनीकरणासाठी येणारा खर्च  "मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान १०२- उच्च न्यायालये, (११) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण, (११) (०१) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण (२०१४  ०५४८) या लेखाशीर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी उपरोक्त कामे मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या Dedicated Cell ने निश्चित केलेल्या  कामामधीलच असल्याची खातरजमा करण्याची तसेच सदर अंदाजपत्रके सक्षम अधिका-यांकडून साक्षांकित करण्याची जबाबदारी  मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांची राहील. प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्याकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.सं.क्र.३९६/इमा.२, दि.१७/१०/२०१६ व अनौ.सं.क्र.५४६/इमा-२, दि.२२/१२/२०१६  अन्वये त्या विभागाच्या सहमतीने तसेच शासन निर्णय, विधि व न्याय विभाग,क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/का.नऊ, दि.१२/६/२०१७ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२२१६२२२३७६१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.06.22 16:24:26 +05'30'

**( सं.सं.नवगिरे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रबंधक (निरिक्षणे २), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
२. मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,
९. विधि व न्याय विभाग (का.९/२३), मंत्रालय, मुंबई,
१०. निवडनस्ती. (कार्यासन ११)